अर्थसंकल्पीय अनुदान सन २०१८-२०१९
स्मार्ट ग्राम योजनेंतर्गत निधी वितरीत
करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन शुध्दिपत्रक क्रमांकः स्माग्रायो-२०१८/प्र.क्र.१४१/योजना-११
बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ
फोर्ट, मुंबई-४०० ००१
दिनांक : २४ जुलै, २०१८

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो-२०१६/प्र.क्र.१५३/योजना-१, दिनांक २१ नोव्हेंबर, २०१६.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८.
३) शासन निर्णय समक्रमांकः दिनांक ०८ जून, २०१८.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय क्र.स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१/अ/योजना-१, दिनांक २१ नोव्हेंबर, २०१६ अन्वये, स्मार्ट ग्राम योजनेसाठी प्रथम वर्षात सन २०१६-१७ मध्ये प्रथम स्तरावरील तालुका स्मार्ट ग्राम ग्रामपंचायतींना रोख स्वरुपात पारितोषिक वितरण करण्यात येईल अशी तरतूद आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार, सन २०१६-१७ पासून जिल्हा परिषदांनी समांतर कार्यवाही करुन दिनांक १ मे, २०१७ रोजी जिल्हा स्मार्ट ग्राम निवड करावयाची योजना होती. स्मार्ट ग्राम योजनेच्या कालबध्द कार्यक्रमानुसार माहे-मे, २०१७ मध्ये राज्यातील ३४ जिल्हा परिषदांनी जिल्हा स्मार्ट ग्राम निवड प्रक्रिया पूर्ण केली आहे. सन २०१६-१७ प्रथम वर्ष म्हणून राज्यातील काही जिल्हा परिषदांनी जिल्हा स्मार्ट ग्राम ग्रामपंचायतींची निवड केलेली आहे तसेच काही ग्राम पंचायतींनी प्रथम म्हणून सन २०१७-१८ करिता जिल्हा स्मार्ट ग्राम पुरस्कार देण्यासाठी निवड केलेली आहे. त्यामुळे जिल्हास्तरावर जिल्हा स्मार्ट ग्राम पुरस्कार देण्यासाठी सविस्तर माहिती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

जिल्हास्तरावर निवड झालेल्या जिल्हा स्मार्ट ग्रामपंचायतींना पारीतोषिकाची रक्कम वितरीत करण्याचे निर्देश संदर्भांकित ३) वरील दिनांक ८.६.२०१८ च्या आदेशान्वये देण्यात आले आहेत. याबाबत स्पष्ट करण्यात येते की, प्रथम वर्ष सन २०१६-१७ मधील तालुकास्तरावर बक्षिसपात्र ठरलेल्या व याच तालुका स्मार्ट ग्रामपंचायती मधून प्रथम वर्षासाठी जिल्हास्तरावर जिल्हा स्मार्ट ग्राम पारितोषीकासाठी जिल्हा स्मार्ट ग्राम म्हणून जे गाव पात्र ठरविलेले असेल तर अशा पात्र ठरविलेल्या जिल्हा स्मार्ट

गावाकरिता दिनांक ८.६.२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार वितरीत करण्यात आलेल्या निधीचा विनियोग त्या जिल्हा स्तरावरील गावाच्या बक्षिसाकरिता प्रथम करण्यात यावा. तद्नुसार स्मार्ट ग्राम योजनांतर्गत सन २०१६-१७ करिता व्दितीय स्तरावर निवड झालेल्या राज्यातील ३४ जिल्हा स्मार्ट ग्राम पंचायतींना प्रत्येकी रुपये ४०.०० लक्ष इतक्या पारितोषिकांची रक्कम प्रथम वितरीत करण्यात यावी.

२. त्यानंतर, व्दितीय वर्ष सन २०१७-१८ करिता तालुकास्तरावर तालुका स्मार्ट ग्राम पारितोषीकासाठी निवडलेल्या व याच तालुका स्मार्ट ग्राम पंचायतीमधून जिल्हास्मार्ट ग्राम म्हणून निवड केली असेल तर अशा व्दितीय वर्षासाठी जिल्हा स्मार्ट ग्रामपंचायतींना पारितोषीकाच्या विनियोगासाठी तद्नंतर निधी वितरीत करण्यात यावा. तसेच याबाबत निधीची कमतरता आढळून आल्यास तद्नुसार शासनाशी शीघ्रतेने पत्रव्यवहार करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२४१५११३०४७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manoj D Jadhav

Digitally signed by Manoj D Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a83fc829949e9b1a022b031436c946028b48d51f5a1bf36ca3ce4fead857da72, cn=Manoj D Jadhav
Date: 2018.07.25 11:51:51 +05'30'

**मनोज जाधव**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२,नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी,महाराष्ट्र राज्य (अराप/रालेवि-१), मुंबई
४. विभागीय आयुक्त,कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
५. (सर्व) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
६. (सर्व) जिल्हा कोषागार अधिकारी
७. (सर्व) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद
८. सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत).
९. अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-१५),मंत्रालय, मुंबई-३२.
१०. कार्यासन अधिकारी (वित्त -१) ग्रामविकास विभाग,बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
११.निवड नस्ती (योजना-११)